**जागतिक बँक सहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाचा टप्पा-२ राबविण्यास तत्वत: मान्यता तसेच गावांच्या निवडीसाठी समिती स्थापन करण्यास मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नादेकृ ४६२२/प्र.क्र. ९४/८-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० जून,२०२३

वाचा :- १) हअप्र-०७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष, दि.१७ जानेवारी, २०१८.
२) हअप्र-०७१६/प्र.क्र.८२/८अे, दि.१७ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

हवामान बदलास अतिसंवेदनशील असलेल्या विदर्भातील अकोला, अमरावती, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ व वर्धा, मराठवाड्यातील छत्रपती संभाजी नगर, जालना, बीड, लातूर, धाराशीव, परभणी, हिंगोली व नांदेड जिल्ह्यांतील ४६८२ गावे (विदर्भातील पूर्णा नदीच्या खोऱ्यातील खारपाण पट्ट्यातील ९३२ गावांसह) तसेच जळगाव जिल्ह्यातील ४६० गावे अशा एकूण ५१४२ गावांमध्ये संदर्भ क्र. १ अन्वये माहे मे,२०१८ पासून जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प राबविण्यात येत आहे. प्रकल्पामध्ये निवडण्यात आलेल्या ५१४२ गावांपैकी विविध कारणांमुळे प्रकल्पाची अंमलबजावणी करणे शक्य नसलेल्या ६४ गावांऐवजी नाशिक जिल्हयातील मालेगाव तालुक्यातील सर्व (१४२) गावांचा समावेश संदर्भ क्र.२ अन्वये या प्रकल्पामध्ये करण्यात आला आहे. त्यामुळे सद्यस्थितीत ५२२० गावांमध्ये प्रकल्प राबविण्यात येत आहे.

२. या प्रकल्पाच्या यशस्वीतेमुळे राज्याच्या इतर जिल्ह्यांमधील गावांचा या प्रकल्पामध्ये समावेश होण्याची मागणी लोकप्रतिनिधींमार्फत शासनाकडे सातत्याने करण्यात येत आहे. मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक २० ऑक्टोबर, २०२२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये "नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाचा दुसरा टप्पा सुरु करण्याची आवश्यकता तपासावी" असे निर्देश देण्यात आले आहेत. तसेच नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या सुकाणू समितीच्या दि. ०६ डिसेंबर,२०२२ रोजी झालेल्या बैठकीत सदर विषय विचारात घेण्यात आला असता, प्रकल्पाच्या दुस-या टप्प्याच्या आखणीचे काम आणि तांत्रिक समितीची स्थापना करून गाव निवडीचे शास्त्रशुद्ध पद्धतीने निर्देशांक ठरवून त्या आधारे दुसऱ्या टप्प्याकरीता गावांची निवड प्रस्तावित करून तसा तपशीलवार प्रस्ताव विहित कार्यपद्धतीनुसार सादर करण्याच्या सूचना समितीने दिल्या आहेत.

३. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पामध्ये सद्य:स्थितीत समाविष्ट असलेल्या १६ जिल्ह्यांसह विदर्भातील उर्वरित नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या जिल्ह्यांमध्ये अंदाजित रु.६००० कोटी किंमतीचा टप्पा-२ प्रकल्प राबविण्यास तत्वत: मान्यता तसेच या टप्पा-२ साठी गाव निवडीचे निकष व गावांची निवड करण्यासाठी अपर मुख्य सचिव, कृषि यांच्या अध्यक्षतेखाली गाव निवड समिती स्थापन करण्यासाठीच्या प्रस्तावास मा.मंत्रिमंडळाने दि.२८ जून,२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. जागतिक बँक अर्थसहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पामध्ये सद्य:स्थितीत समाविष्ट असलेल्या १६ जिल्ह्यांसह विदर्भातील उर्वरित नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली अशा एकूण २१ जिल्ह्यांमध्ये अंदाजित रु.६००० कोटी (रू.सहा हजार कोटी) किंमतीच्या जागतिक बँक अर्थसहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाचा टप्पा-२ राबविण्यास शासनाची तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाच्या टप्पा-२ च्या आखणीचे काम आणि गाव निवडीचे शास्त्रशुद्ध पद्धतीने निकष ठरवून त्याआधारे टप्पा-२ करीता गावांची निवड करण्यासाठी पुढीलप्रमाणे गाव निवड समिती स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग | अध्यक्ष |
| २. | प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई | सदस्य सचिव |
| ३. | कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | सदस्य |
| ४. | कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | सदस्य |
| ५. | कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी | सदस्य |
| ६. | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| ७. | आयुक्त, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे | सदस्य |

३. उपरोक्त समिती प्रकल्पाच्या टप्पा-२ मध्ये समाविष्ट करावयाच्या गावांसाठीचे निकष निर्धारित करेल व त्यानुसार गावांची निवड प्रस्तावित करेल. निवडलेल्या गावांच्या यादीस मा.मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात येईल.

४. प्रकल्पाची संकल्पना टिप्पणी (Concept Note), सविस्तर प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) व त्यासोबतचे विविध मॅन्युअल्स (वित्त व्यवस्थापन, प्रापण, पर्यावरणीय व सामाजिक व्यवस्थापन संरचना इ.) तयार करणे, त्यास वेळोवेळी राज्य शासनाची, केंद्र शासनाची व जागतिक बँकेची मान्यता घेणे या सर्व बाबींची पूर्तता नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाच्या प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकडून करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक २८ जून,२०२३ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६३०१८०६४२६६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.06.30 18:08:40 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.राज्यसभा / लोकसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधानसभा, विधाननंडळ, मुंबई.
४. सर्व विधान परिषद / सभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
५. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा. मंत्री (कृषि), कृषी व पदुम विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई.
१४. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे,
१५. कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला,
१६. कुलगुरु, वसंतराव नाईक, मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी,
१७. कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी
१८. विभागीय कृषी सहसंचालक (सर्व),
१९. जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी (सर्व),
२०. कृषि आयुक्त, (अेजी १० सेल) महाराष्ट्र राज्य, पुणे (खर्च ताळमेळ शाखा),
२१. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
२२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
२४. वित्त विभाग (व्यय १ /बियुडी १३), मंत्रालय, मुंबई,-४०० ०३२,
२५. नियोजन विभाग (कार्यासन १४३१) मंत्रालय, मुंबई,-४०० ०३२,
२६. कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक - २अे /६अे/ ७अे, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२७. निवड नस्ती.